ISSN 2278-8808 SJIF 2014 = 4.889
An International Peer Reviewed & Referred
SCHOLARLY RESEARCH JOURNAL FOR INTERDISCIPLINARY STUDIES

# डॉ. आंबेडकरांचे सामाजिक, आर्थिक शैक्षणिक, राजकीय विचार

**प्रा.डॉ. अजय कुमार रामदास इंगळे,**
समर्थ शिक्षणशास्त्र महाविद्यालय, भाडणे ता. साक्री, जि. धुळे.



"उद्धरली कोटी फुले, भीमा तुझ्या जन्मामुळे
जखडबंद पायातील साखळदंड
तटातट तुटले तु ठोकताच दंड
झाले गुलाम मोकळे, भीमा तुझ्या जन्मामुळे"

आयुष्यभर खडतर ज्ञानसाधना करून विधिशास्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, राज्यशास्त्रज्ञ, दलित, शोषित, पिडित लोकांच्या उन्नतीसाठी आपले आयुष्य समर्पित करणारे, एक खंबीर पत्रकार, एक शिक्षण संस्थापक, दलितोद्धारक, ज्ञानपिपासू ग्रंथवेडे व्यक्तीमत्त्व, ज्ञानसुर्य, प्रज्ञासुर्य, सामाजिक न्याय व समतेचा पुरस्कार करून लोकशाहीचे मुल्य विरोधार्थ माननारे, स्वातंत्र्य, समता, बंधुता, न्याय या चार आधारभूत तत्त्वांचे पुरस्कर्ते म्हणजेच भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर. खरोखर डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणजे एक महान विचार आहे. एक दलितांची, शोषीतांची अस्मीता आहे. जिवनविषयक दृष्टीकोन आहे, जगण्यातील शक्ती आहे, अन्यायाविरुद्ध लढण्याची एक आंतरिक प्रेरणार आहे. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या ज्ञानाने, अभ्यासाने हजारो वर्षे गुलामगीरित पडलेल्या लोकांना गुलामगिरीविरुद्ध लढण्याची हिम्मत दिली. त्यांचे विचार म्हणजे परीवर्तनवादी धगधगता ज्वालामुखीच, अशा या महामानवाचे सामाजिक, आर्थिक व राजकीय विचार पुढीलप्रमाणे मांडण्याचा हा एक छोटासा प्रयत्न...

**१) सामाजिक विचार :** ज्या लोकांमध्ये आपला जन्म झाला त्या लोकांचा उद्धार करणे हे आपले कर्तव्य आहे ही जाणीव ज्यांना आहे ते धन्य होत. या उद्देशाने डॉ. आंबेडकरांनी दलित, अस्पृष्य, मागास वर्गीयांसाठी कायद्याचे उल्लंघन न करता माणूसकीने प्रबोधनाची फार मोठी चळवळ उभी केली. डॉ. आंबेडकरांचे तत्त्वज्ञान म्हणजे मानव मुक्तीचा जाहीरनामा होय. समाजात ज्या रुढी परंपरा, गैरसमजूती वास करत असतात. त्यांचा समाजप्रबोधनासाठी बिमोड करणे आवश्यक असते. सर्व मानव प्राणी समान आहेत. डॉ. बाबासाहेबांना त्यांच्या काळात समाजाकडून खूप सहानुभूतीशुन्य वागणूक मिळाली होती. स्पृष्य-अस्पृष्यता भेदभाव, विटाळ इ. गोष्टींनी बाबासाहेबांचे मन खुप हादरले होते. त्यामुळे त्यांच्या विचारांना एक तिक्ष्ण धार निर्माण

झाली आहे. समाजातील प्रत्येक व्यक्तीस स्वातंत्र्य, समता, बंधूना, न्याय या मुल्यांनुसार जगण्याचा अधिकार असावा प्रत्येक व्यक्तीला संधी मिळण्यात यावी याची तरतुद बाबासाहेबांनी घटनेत करून ठेवली. म्हणूनच भारतीय राज्यघटना म्हणजे तो एक सामन्यांचा बुलंद आवाज आहे. सामाजिक प्रबोधनाच्या दृष्टीने डॉ. बाबासाहेबांनी २० जुलै १९२४ ला बहीष्कृत हितकरीणी सभा स्थापन केली होती. तीचे ब्रिदवाक्य होते- ‘‘शिका संघटित व्हा संघर्ष करा’’ याद्वारे बाबासाहेबांनी सर्व प्रकारच्या उपेक्षित समाजामध्ये एक शिकण्याची उर्मी निर्माण केली. सामाजिक विषमता दूर करण्याचा व अन्यायाचा प्रतीकरण करण्याचा महामंत्र बाबासाहेबांनी आपल्याला दिला समाजातील अस्पृष्यतेबद्दल ते म्हणतात.

‘‘Untouchabitiy is nothing but slavery tell slave he is a slave he will revolt’’ म्हणजे ‘‘अस्पृष्यता ही काही एक नसून सरळसरळ गुलामगीरी आहे. गुलामाला त्याचा गुलामीची जाणीव करून द्या तरच तो बंड करून उठेल.’’ खरोखर बाबासाहेबांनी हजारो बर्षे गुलामगीरीत पडलेल्या माणसाला एक नवचैतन्य दिले. बाबासाहेबांनी अस्पृष्य समाजातील माणसाला गटारीतून मोटारित बसवले त्या काळी समाजात जी अस्पृष्यता पाडली जात होती जो भेदभाव केला जात होता त्यामुळे डॉ. बाबासाहेबांचे मन खुप हेलावले होते. भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न पण ऐरणीवर आला होता. परंतु बाबासाहेबांना या स्वतंत्र्याबरोरबच सामाजिक स्वातंत्र्य पण हवे होते. म्हणूनच ते म्हणतात की, ‘टिळक जर अस्पृष्य समाजात जन्माला आले असते तर त्यांनी स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे. ही घोषना केली नसती तर त्यांनी अशाप्रकारे म्हटले असते ही ‘अस्पृष्यता निवारण हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे.’’’

म्हणूनच त्यांनी सामान्य जनतामध्ये आपल्या अधिकारांप्रती जागृतीची भावना रुजवली ते म्हणतात. ‘‘अधिकार हे अर्ज विनंत्या किंवा भिक मागुन मिळत नसतात तर त्यासाठी संघर्ष करावा लागतो. बळी हा नेहमी बक-यांचा दिला जातो वाघाचा नाही’’ ‘तर तुम्ही वाघ व्हा’ शंकर दिवस शेळी होवून जगण्यापेक्षा एक दिवस वाघ होवून जगा. समाजामध्ये जो जातीभेद उसळला होता त्याबद्दल डॉ. आंबेडकर म्हणतात की जात हिला काही कुढलाही शास्त्रीय आधार नाही. विशिष्ट धार्मिक पुजा अर्चाकरणा-या लोकांनी आपले स्थान अबाधित रहावे या उद्देशाने दुसरा लोकांना चिटकवलेले ते एक विरुद्ध आहे. डॉ. आंबेडकर सामाजिक असमतेबद्दल म्हणतात, ही हिंदू धर्माची समाजरचना एक उतरंड आहे की ज्यावर अनेक मजले आहे. खालच्या मनज्यावरील कितीही लायक असला तरी त्याचा वरच्या-वरच्या मजल्यावर जाण्याची मुभा नाही किंवा तसला मार्गच नाही आणि वरचा मजल्यावरील माणूस हा कितीही नालायक असला तरी त्याला खाली ढकलून देण्याची कुणाची हिम्मत नाही. अशाप्रकारची समाजव्यवस्था ही समाजाच्या विकासामध्ये बाधा निर्माण करते म्हणून सर्व समाजामध्ये ऐक्याचे भाव निर्माण व्हायला पाहिजे. डॉ. आंबेडकर तत्कालीन हिंदू समाजाला इशारा देताना की तो दिवस आता दूर नसेल की जेव्हा हिंदू धर्मातील जाचाला छळाला कंटाळून समाजातील अनेक वंचित घटक हे इतर धर्माकडे उदा. मुस्लीम, ख्रिश्चन धर्माकडे आकर्षित व्हायला लागतील किंबहुना ती प्रक्रियाच सुरू झालेली आहे. त्यामुळे ज्या समाजात माणसाला माणूसकीने वागवले जात नसेल, पशुपेक्षाही अत्यंत हिन दर्जाची वागणूक मिळत असेल त्या धर्मात किंवा समाजात राहून काय उपयोग, गाईच्या मोमुत्राने किंवा शेणाने मनुष्य पवित्र होते व त्याच माणसासारख्या दिसणा-या माणसाच्या स्पर्शाने, किंबहुना सावलीने मनुष्यांचा विटाळ होत असेल, तर अशा धर्मात न राहिलेले बरे पुढे जावून डॉ. आंबेडकर म्हणतात की, जर तुम्ही म्हणतात की तुमच्या धर्म तो आमचा धर्म तर तुमचे अधिकार ते आमचे अधिकार असायला हवे पण तसे होताना दिसत नाही आणि तरीसुद्धा तुम्ही म्हणतात ही अस्पृष्यांची याच प्रवाहात राहायला हवे ते काय फक्त लाथा आणि बुक्यांचा मार खायला का? अस्पृष्यतेमुळे

अस्पृष्यांचा हिंदू समाजाचा व र्यायाने आपल्या देशात सर्वनाश झाला आहे. जर समाजजातील वंचित घटकाला त्यांचे मानाचे स्थान किंवा त्याचा स्वआदर राखला गेला आणि त्याला स्वातंत्र्य प्रदान केले तर या देशाच्या विकासावर जडणघडणीत, प्रजातीत त्या वर्गाच्या कामाचा बुद्धमत्तेचा, धर्माचा अत्यंत मोलाचा वाटा असेल आणि तेव्हांच देश प्रगतीपथावर जाईल. समाजातील या वंचित घटकांमध्ये आत्मबळ निर्माण होण्यासाठी बाबासाहेब सांगतात की, तुम्ही तुम्हाला अस्पृष्ट असे कधीच समजू नका. एक स्वच्छ जिवन जगा. स्वच्छ कपडे परिधान करा. जरी तुमच्या कपड्यांना ठिगळ लावलेले असले तरी चालेल पण ती कपडे निटनेटके व स्वच्छ असावी. कपडे व दागीने परिधान करण्याच्या बाबतीत तुमचे स्वातंत्र्य कुणीही हिरावून घेवून शकत नाही. सामाजिक आणि धार्मिक क्रांतीच्या माध्यमातूनच राजकीय क्रांत्या उदयास आल्या आहेत असे इतिहास सांगतो. अशा प्रकारे डॉ. बाबासाहेबांनी समाजातील उपेक्षित आणि वंचित घटकांसाठी आपला आवाज अठवला व या घटकाला समाजाच्या महत्त्वाच्या प्रवाहात आणण्यासाठी बाबासाहेबांनी जे काही केले ते अद्याप कुणी केले असेल असे वाटत नाही. अशा प्रकारे त्यांचे सामाजिक विचार सांगता येतील.

**डॉ. बाबासाहेबत आंबेडकर यांचे आर्थिक विचार :** डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे अर्थशास्त्राचे गाढे अभ्यासक होते. ते एक थोर अर्थशास्त्रज्ञ होते. पैशांअभावी पावाच्या एका तुकड्यावर भूक भागवून ज्ञानांसाठी जगणारा माणूस, पण ज्ञानाची भूक सतत तेवत ठेवणारा महापुरुष, पावाचा त्यात एक तुकड्यावर रात्रभर अभ्यास करून विविध मोठे मोठ्या पीएच.डी. डी.एस्सी सारख्या पदव्या प्राप्त करणारा माणूस आज देशाचा थोर अर्थशास्त्रज्ञ होतो की खरोखर तमाम भारतीयांसाठी अभिमानाची बाब आहे. स्त्री-पुरुष, वंचित, दुर्बल, कामगार, कष्टकरी, शेतकरी, मजूर या सर्वांसाठी बाबांनी आपले अर्थशास्त्रीय भाषेतुन अत्यंत मोलाचे विचार मांडले आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा जागतिक दर्जाचे अर्थशास्त्रज्ञ म्हणून नावलौकीक झाला आहे.

कोलंबिया विद्यापीठात एम.ए. करीत असताना त्यांनी 'Administration and finance of the East India Company' ईस्ट इंडीया कंपनीचे प्रशासन आणि अर्थनिती अशा नावाचा एक प्रबंध लिहिला त्यात ते त्यांनी इ. सन १७७२ ते १८५८ पर्यंतच्या काळातील ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रशासकीय धोरणांचा अभ्यास केला ते म्हणतात की, ईस्ट इंडीया कंपनी ही निव्वळ व्यापारी दृष्टीकोन ठेवून नफा मिळकत आहे. त्यांच्या हिशेबामध्ये या पुस्तकांच्या माध्यमातुन ब्रिटीश संसदेला इशारा दिला की, ब्रिटिश लोकसभेने कायदा करून कंपनीत आपल्या प्रशासनाचा व व्यापाराचा हिशोब वेगळा ठेवावा. ब्रिटिश भारतातील प्रांतिक अर्थ व्यवस्थेशी उत्क्रांती या पीएच.डी. साठी लिहिलेल्या प्रबंधात डॉ. बाबासाहेबांनी इ.स. १८३३ ते १९२९ या काळात घटक राज्ये व ब्रिटिशांचे केंद्र सरकार यांच्यातील आर्थिक संबंध कसे कसे सुधारत गेले याचे विस्तृत व सविस्तर लिखान केले आहे. त्याचबरोबर बेजाबदार पद्धतीने उधळपट्‌टी भारतीय जनतेला कसे पिळवटून काढले आहे. हे सुद्धा नमुद केले आहे. या प्रबंधात बाबासाहेबांनी ब्रिटिश सरकारचा हिशोबाचा गोंधळ एकूण चार भागात नमुद केले आहे.

साम्राज्यावादी हिशोब

स्थानिक स्वराज्य संस्थांचे हिशोब

प्रांतिय हिशोब

समाविष्ट न केलेले हिशोब

भारतीय साम्राज्यावादी ब्रिटिश सरकारच्या आर्थिक दुर्दशा कशाने झाली याचे विवेचन बाबासाहेबांनी केले आहे. इ.स. १८३३ ते १९३३ ते १९२१ च्या दरम्यान भारतीयांवर जे विविध प्रकारचे कर लादण्यात आले त्यामुळे लोकांचे अतोनात हाल झाले.

ब्रिटिशांनी जमिनीवर जवळजवळ ६६ टक्के, मिठावर ९ ते १४ टक्के, जकात २ ते ६ टक्के या सर्व गोष्टीस केंद्र सरकारच जबाबदार आहे. त्यामुळे जे जुलमीकर आहे ते कमी करावे सर्व भारतात अकांऊट व तपासणी समान ठेवाव. त्याचबरोबर केंद्र सरकारच्या हातात ज्या काही आर्थिक चाब्या आहेत. त्यांचे विकेंद्रीकरण करण्यात यावे. त्यासाठी ते व्यापार उद्योगांवर कर आहेत, घरांवर कर आहेत, वारसा हक्काने मिळणा-या जमिनीवर कर आहेत यांचे अधिकार प्रांताकडे देण्यात यावे. डॉ. आंबेडकर यांनी पुढच्या प्रकरणात असे म्हणतात की, प्रांतिक आर्थिक व्यवस्थेच्या मर्यादांची मांडणी केली आहे. ते म्हणतात ही प्रांताला स्वतंत्र्य कर वसुली, स्वतंत्र सेवा खाते, स्वतंत्र अकांऊट असावे. त्यानंतरच्या चौथ्या भागात डॉ. बाबासाहेब आंबेडकर केंद्र सरकारला धारेवर धरण्याचा प्रयत्न करतात. ते म्हणतात की, वरिष्ठ व श्रीमंत जमीनदार मळेवाले, तालुकादार इ. लोकांना कर माफ होते तर भारताच्या जनतेला मात्र वा-यावर सोडण्यात आले असे म्हणतात. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या त्यानंतरच्या ग्रंथात रुपयाचा प्रश्न - उगम प उपाय १९२९ या ग्रंथात आपले आर्थिक विचार मांडताना म्हणतात की, सन १८०० ते १८०३ या कालखंडातील भारतीय रुपयाची चलनाचे परिणाम म्हणून कशी जडणघडण झाली याचे विवेचन बाबासाहेबांनी या ग्रंथात केले आहे. ते म्हणतात की, रुपयाची आपल्या देशातील क्रयशक्ती कमी होत गेली ही महत्त्वाची कमी होत गेली. ही महत्त्वाची बाब सत्ताधारी विसरले होते. म्हणून आज रुपयाचा प्रश्न निर्माण झाला. सुरूवातीला सुवर्ण परिणाम व रुपयाचे परिणाम अशी दुहेरी चलन पद्धती अस्तीत्त्वात होती. सन १९३३ दरम्यान इंग्रजांचा भारतात एक कलमी कार्यक्रम सुरू झाल्यावर १८३५ च्या कायद्यान्वये सुवर्ण परिणाम रद्द करून देशभर रुपयाच्या परिणामाच्या सुरूवातीला चलनपद्धतीचे एक सुत्रीकरण करण्यात आले. त्यानुसार १८० ग्रॅम वजनाचा चांदिचा रुपया प्रचलित झाला. पण पुढे चलनाच्या गरजा भागवण्यासाठी ते अपुरे पडू लागले. त्याची कारणे ही लष्कराला, सरकारी अधिका-याला धान्य किंवा जमिनीच्या स्वरुपात दिले जावू लागले. तसेच आंतरराष्ट्रीय व्यापार वाढल्यामुळेही चलनांचा वापर वाढला. सुवर्णविनीमयामध्ये लवचिकता जरी असली तरी ते एक हा दुधारी अस्त्र आहे. चलननिर्मिती लवचिक असल्यामुळे ती अतीनिर्बंध होवू शकते. त्यामुळे चलनफुगवटा व भाववाढ होत असते आणि त्यावरुनच रुपयाची किंमत घसरते. डॉ. आंबेडकरांनी सांगितलेले आर्थिक विचार आज सुद्धा अत्यंत मार्गदर्शक आहे. आज आपल्यासमोर रुपयाची घसरण, भाववाढ इ. समस्या उभ्या आहेत. डॉ. बाबासाहेबांनी सांगितलेले हे विचार आपल्यासाठी अत्यंत दिशादर्शक आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुढच्या आपल्या ग्रंथात म्हणजेच ''भारतातील लहान शेतजमिनी व त्यावरील उपाय'' या ग्रंथात शेतीबद्दल अत्यंत मोलाचे विचार मांडतात. ते म्हणतात की भारतात शेती हा मुख्य व्यवसाय आहे. जास्तीत जास्त लोकांच्या उदरनिर्वाह हा शेतीवर चालतो. या आपल्या ग्रंथात डॉ. आंबेडकर शेतक-यांना इशारा देतात की, शेतीचे लहान-लहान तुकड्यांत विभाजन करने हे अत्यंत धोकादायक आहे. त्याचबरोबर ते शेतक-यांला शेतीबरोबर अनेक जोडव्यवसाय सुद्धा करण्याचा सल्ला देतात. आज अनेक ठिकाणी शेतक-यांच्या आत्महत्या होत आहेत या आत्महत्यांवर एकच उपाय म्हणजे बाबासाहेबांनी सांगितलेले विचारांची अमंलबजावणी करणे होय. परंतु असे म्हणावयास हरकत नाही की या देशाने बाबासाहेबांचे विचार समजून घेण्याचा प्रयत्नच कधी केला नाही. त्यांना फक्त दलितांचे नेते एवढेच विरुद्ध लावून त्यांनी सांगितलेले गोष्टींना डोळे झाक करण्यात आले.

**डॉ. आंबेडकरांचे शैक्षणिक विचार :**डॉ. आंबेडकर म्हणजे शिक्षणाचा एक महामेरुच होय. त्यांनी शिक्षणविषयक आपले व्यापक विचार मांडले आहेत. जनसामान्यांसाठी व वंचितांसाठी ते दिपस्तंभासारखे मार्गदर्शक आहेत. शिक्षणातून स्वातंत्र्य, समता, बंधुता, न्याय या तत्त्वांचा पुरस्कार व्हावा व मानव कल्याणाच्या तत्त्वास अनुसरून जीवन व्यक्तीत करणारा समाज

निर्माण व्हावा असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना वाटत होते. त्यांचे शैक्षणिक विचार पुढीलप्रमाणे. डॉ. आंबेडकर शिक्षणाची व्याख्या करताना म्हणतात की, ''व्यक्तीला जाणीव करून देते ते शिक्षण होय'' ज्याप्रमाणे मानवाला जगण्यासाठी अन्नाची आवश्यक आहे त्याचप्रमाणे विद्येचीही आवश्यकता आहे. शिक्षणाअभावी तो एखाद्या गुलामासारखाच असतो. म्हणून बाबासाहेब जनसामान्यांना ''शिका, संघटित व्हा, संघर्ष करा. असा मंत्र देतात शिक्षणातून ब-यावाईटाची जाणीव माणसाला होते. अन्यायाविरुद्ध आवाज उठवण्याची धमक त्याच्यात येते.''

शिक्षण एक शस्त्र आहे असे डॉ. बाबासाहेबांना वाटते. शिक्षणाला बाबासाहेबांनी तलवारीची उपमा दिली आहे. ज्याप्रमाणे तलवार एखाद्याच्या संहार करू शकते तसेच ती संरक्षणासाठी उपयोगी पडत असते. म्हणजेच शिक्षणासोबत व्यक्तीजवळ चांगले शील असणे तेवढेच अपरिहार्य आहे. शीलवान व्यक्ती आपल्या ज्ञानाचा उपयोग चांगल्या कामासाठी करत असतो.

समाजात ज्या काही अनिष्ठ रुढी परंपरा आहेत. त्या रुढी परंपरांकडे बघण्याचा एक वैज्ञानिक दृष्टीकोन व्यक्तीच्या मनात शिक्षणामुळेच निर्माण होतो. समाजात जो काही भेदभाव आहे तो दूर करण्याचा प्रयत्न शिक्षणाद्वारेच करता येवू शकतो. ज्याप्रमाणे अन्नाच्या अभावी माणूस हा हतबल व अल्पायुषी होतो. त्याचप्रमाणे शिक्षणाच्या अभावी माणूस हा जिवंतपणी दुस-यांचा गुलाम होतो. बाबासाहेबांच्या मते शिक्षण हिच शोषणमुक्तीची पायवाट आहे. शिक्षणाच्या माध्यमातून व्यक्तीमध्ये स्वउद्धाराची तळमळ निर्माण होते. आपल्या दुसरा कोणीतरी उद्धार करण्यासाठी येईल ही भावना टाकून देवून आपला उद्धार आपणच करावयाचा ही भावना त्याच्यात निर्माण होते. डॉ. आंबेडकरांचे शिक्षणासंदर्भातील विचार अत्यंत मार्मिक आहेत. शिक्षणातून समानता प्रस्थापित व्हावी व सर्वप्रकारच्या असमानतेला आळा बसावा असे त्यांचे मत होते. शिक्षण प्रत्येकाच्या आवाक्यात आणता आले पाहिजे. म्हणून निम्नस्तरीय वर्गासाठी शिक्षण जेवढे स्वस्त व सुलभ करता येईल तेवढे करता आला पाहिजे. डॉ. आंबेडकर म्हणतात की सर्व जाती जमातींना एका समानतेच्या पातळीवर आणवयाचे असेल तर त्यावरील एकमेव उपाय म्हणजे असमानतेचे तत्त्व नाकारणे आणि ते ज्या पातळीखाली आहेत त्यांना आपुलकीची वागणूक देणे त्यासाठी बाबासाहेब एक उदाहरण देतात ते म्हणतात की, जे लोक सर्व बार्बीमध्ये समानतेच्या तत्त्वावर भर देतात ते सोयीस्कर विसरतात की पाच आणि दहा या आकड्यांना दोन या अंकाने गुणीले तर त्यांचा गुणाकार अनुक्रमे दहा आणि वीस येईल. पण दोन्ही बाबतीत वीस होत नाही. म्हणजेच त्यांच्या मते समानतेचा अर्थ म्हणजे खालच्या वर्गाची पातळी वरच्या वर्गाच्या पातळीपर्यंत आणणे होय. त्यासाठीच बाबासाहेब म्हणतात की, खालच्या पातळीच्या लोकांना शिक्षण घेण्यासाठी विशेष सवलती उपलब्ध करून दिल्या पाहिजेत.त्याचबरोबर शिक्षणांतून चारित्रसंबंर्धन होणे आवश्यक आहे. शिक्षणाला चारीत्राची जोड असावी चांगल्या चारित्र्यामुळे ज्ञान चांगल्या अथवा वाईट कामासाठी वापरावयाचे की नाही ते ठरविता येते. मानवी सभ्यता व संस्कृतीचा खरा पाया म्हणजे शिक्षण होय. शिक्षणाचा खरा उद्देश शील आणि चारित्र्याची निर्मिती करणे असा असला पाहिजे. प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण करण्यात जनसामान्यांना, वंचितांना प्राथमिक शिक्षण मिळावे यासाठी त्यांनी अधिक जोर धरला वयाच्या ६ ते १४ वर्षाच्या मुलांना शाळेत पाठविण्याची सक्ती करण्यात यावी असे बाबासाहेबांना मनोगत वाटत होते. प्राथमिक शिक्षणाविषयी विचार मांडताना डॉ. बाबासाहेब म्हणतात, ''प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार राष्ट्राच्या सर्वांगिण प्रगतीच्या इमारतीचा पाया आहे. केवळ लोकांच्या खुशीवर हा प्रश्न सोडवल्यास प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार होण्यास कैक वर्ष लागतील म्हणून शिक्षणाच्या बाबतीत सक्तीचा कायदा करावा लागतो.'' डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी स्त्री शिक्षणाचा पुरस्कार मोठ्या हिरीरीने केलेला आपल्याला दिसून येतो. मूलांच्या शिक्षणा बरोबरच मुलींच्याही शिक्षणासाठी धडपड

केल्यास आपल्या समाजाची प्रगती झपाट्याने होईल असे बाबासाहेबांना वाटत असे. डॉ. बाबासाहेबांनी शिक्षणाला वाघीणीचे दूध म्हणून संबोधले आहे. ते म्हणतात की, ''शिक्षण हे एक वाघीणीचे दूध आहे ते आपल्यावर माणूस गुरगुरल्याशिवाय राहत नाही.'' अन्यायाविरुद्ध व शोषणाविरुद्ध लढण्याची हिम्मत शिक्षणामुळे येते म्हणून प्रत्येकाला शिक्षण मिळणे आवश्यक आहे. एकंदरीत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना शिक्षणातून दोन गोष्टी साध्य व्हायला हव्या असे वाटते एक म्हणजे मनुष्याच्या अंगी विचार करण्याची शक्ती वृद्धींगात झाली पाहिजे व दुसरी म्हणजे मनुष्यामध्ये समस्या सोडवण्याची क्षमता आली पाहिजे. खरोखर बाबासाहेबांनी शिक्षणाबद्दल सांगितलेले हे विचार अत्यंत मोलाचे असून सर्वसामान्यांचा प्रेरणादायक आहेत. तसेच प्रगत राष्ट्राच्या विकासामध्ये हे विचार अत्यंत सक्षम आहेत हे मान्य करावेच लागेल. डॉ. बाबासाहेबांनी स्थापन केलेल्या शिक्षण संस्था पुढीलप्रमाणे. **१.** पिपल्स एज्युकेशन सोसायटी - स्थापना ८ जून १९४५ **२.** सिद्धार्थ कला आणि विज्ञान महाविद्यालय - स्थापना २० जून १९४६ (मुंबई) **३.** मिलींद कला व विज्ञान महाविद्यालय - स्थापना १९ जून १९५० (औरंगाबाद) **४.** सिद्धार्थ विधी महाविद्यालय - स्थापना (१९५६) मुंबई

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे राजकीय विचार :** डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या जीवनात लोकशाही शासनपद्धतीचा स्वीकार केलेला आहे. कारण लहाणपणापासून अस्पृष्यतेचे चटके, भेदभावाचे चटके बाबासाहेबांनी सहन केले होते. त्यामुळे स्वातंत्र्य, समता, बंधुता न्याय या मुल्यांवर आधारित समाजरचना असावी असे बाबासाहेबांचे मत होते व लोकशाहीच्या माध्यमातूनच ही मुल्ये जोपासणे शक्य आहे. याची खात्री बाबासाहेबांना होती. बाबासाहेब आपल्या दलित बांधवांना म्हणतात की, तुम्ही या देशाची शासनकर्ती जमात व्हा. डॉ. बाबासाहेबांनी भारत देशाची राज्यघटना लिहिली आहे. हे सर्वांना सर्वश्रुतच आहे. या राज्यघटनेच्या माध्यमातूनच सर्व दलित, पिडीत, वंचीत मागासलेले, उच्च निच्च तसेच स्त्री वर्ग या सर्वांना मतदानाचा हक्क देवून या सर्वांना एका राजकीय प्रवाहात आणण्याचे काम बाबासाहेबांनी केले आहे. ते म्हणतात की सरकार फक्त लोकांसाठी असून चालत नाही तर ते लोकांचे ही असले पाहिजे. सरकारमध्ये व्यक्तीमत्त्वात प्रतिनिधीत्त्व असेल तर त्या सरकारला लोकांचे सरकार म्हणता येईल. एखादी राजकीय चळवळ उभारायची असेल तर त्यासाठी अगोदर देशातील समाज स्थिती कशी आहे हे समजावून घेण्यावर लोकप्रिय सरकारचे भवितत्त्व अवलंबुन आहे. डॉ. बाबासाहेबांनी अस्पृष्यांसाठी स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली होती. पण ती पूर्ण होवू शकली नाही. राजकारणात सर्व गटाचे प्रतिनिधीत्त्व असणे आवश्यक व हिताचे असते. तसेच देशाच्या सामाजिक लोकशाहीला पुरक असते ते बाबासाहेबांचे मत होते.

**समारोप :** अशा प्रकारे डॉ. बाबासाहेब यांचे विचार मांडता येतील. त्यांच्या विचारांमध्ये माणूस हा केंद्र बिंदु आहे. माणसाणे स्वतःस निर्माण केलेल्या विषमतेपासून मानवाला मुक्त करण्याचे हे एक तत्त्वज्ञान आहे. स्वातंत्र्य, समता, बंधुता, न्याय या मुल्यांवर त्यांची विचारसरणी आधारलेली आहे.

**संदर्भ :**

डॉ. घोरमोडे के.यु., सौ. घोरमोडे कला, **उदयोन्मुख भारतीय समाजातील शिक्षण,** विद्या प्रकाशन (नागपूर), २००८, पृ.क्र. ९४ ते १००.

प्रा. पवार ना.ग., **शिक्षणक्षेत्रातील विचारवंत,** नित्यनुतन प्रकाशन, २००८.

डॉ. कठोर अनिल, डॉ. वाघमारे महादेव, डॉ. पाटील गौतम, **महाराष्ट्रातील आंबेडकर चळवळीचा इतिहास,** चिन्मय प्रकाशन, २००९, पृ.क्र. २३६ ते २४७.